महाराष्ट्र आदिवासी विकास सेवा गट- अ मधील उपसंचालक/ उपआयुक्त/ प्रकल्प अधिकारी (श्रेणी-१) या संवर्गातील पदावरील पदोन्नतीबाबत ..

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

## शासन आदेश क्रमांकः बढती-१७१७/प्र.क्र.३२९/का.१५

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई-३२
दिनांक : २८ नोव्हेंबर, २०१८

वाचा :-

१) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.१५६/ का.१२, दि.२८/०४/२०१५
२) सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५ /प्र.क्र.१५६/का.१२, दि.१६/०७/२०१५
३) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/ का.१२, दि.१५/०६/२०१७

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र आदिवासी विकास सेवेतील महाराष्ट्र आदिवासी विकास सेवा गट- अ मधील उपसंचालक/ उपआयुक्त/ प्रकल्प अधिकारी (श्रेणी-१) या (वेतनश्रेणी रू.१५६००-३९१००+ ग्रेड पे ६६००) या आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

२. तद्नुषंगाने शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/ का.१२, दि.२८/०४/२०१५, शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५ /प्र.क्र.१५६/का.१२, दि.१६/०७/२०१५ व शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दि.१५/०६/२०१७ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहित केलेल्या महसूली विभाग वाटप नियम, २०१५ मधील तरतुदींच्या अधिन राहून खालील तक्त्यातील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.रॉबीन त्रिभुवन | उप संचालक, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, पुणे | समितीतील रिक्त पदांवर |
| २ | श्रीमती अ.पा.पिल्लेवार | उप संचालक, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, गडचिरोली | समितीतील रिक्त पदांवर |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | श्री.मनोज चव्हाण | उप संचालक, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, नागपूर | समितीतील रिक्त पदांवर |
| ४ | श्री.दिनेश तिडके | उप संचालक, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, नंदुरबार | समितीतील रिक्त पदांवर |

३. वरील अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती ही खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

i. पदोन्नतीच्या कोट्यातील पदावर देण्यात येत असलेली सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपाची असून, ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

ii. सदर पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

iii. निवडसूचीतील अधिकाऱ्यांनी दि.२५.०१.१९९९ च्या अधिसूचनेव्दारे विहित केलेले महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्यातबाबत) नियम १९९९ व दि.२८.०५.२०१८ च्या अधिसूचनेव्दारे विहित केलेल्या (सुधारणा) नियम, २०१८ नुसार संगणक परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक आहे.

iv. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व जेष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

v. पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाजेष्ठततेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून देण्यात येत आहे.

४. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या पदोन्नत अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवसाच्या आत नियुक्तीच्या पदावर हजर होणे आवश्यक आहे. विहित मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्तीस इच्छुक नाही असे समजून, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२/०९/२०१६ मधील तरतुदींनुसार त्यांच्या पदोन्नतीने केलेल्या नियुक्त्या रद्द करण्यात येतील.

५. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना नविन पदावर रुजू होण्यासाठी कार्यालय प्रमुख / विभागप्रमुखांनी स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नविन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधिताना सूचना दयाव्यात. तसेच संबंधित

अधिकाऱ्यांनी पदभार स्विकारल्यानंतर त्याचा अहवाल आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक व आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

६. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या पदोन्नत अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र. सीडीआर-१०८२/२५६७/२८/११, दि.३०/०८/१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील यांची संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२८१५२४२९४९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Govind Mahadeo Mainkar
Date: 2018.11.28 15:28:29 +05'30'

**(गोविंद माईणकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
६. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई / नागपूर
७. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई / नागपूर
८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक/ अमरावती / नागपूर
९. सर्व सह/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.सर्व सहआयुक्त, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती
११.सर्व अवर सचिव/ सर्व कार्यासन अधिकारी आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
१२.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४.संबंधित अधिकारी,
१५.निवड नस्ती (का.१५)